**"डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना"**
**पीक उत्पादन प्रोत्साहन योजना.**
**योजनेची व्याप्ती वाढविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार व वस्त्रोद्योग विभाग,**
शासन निर्णय क्र. सीसीआर १४२०००/१३११७/प्र.क्र. ३३०/२-स,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - ०४ मार्च, २००३.

वाचा :-

१. क्र. सीसीआर १४९१ /प्र.क्र. ७१४/२-स, दि. २.११.१९९१.
२. क्र. सीसीआर १४९९/प्र.क्र. १९/२-स, दि. ४.२.१९९९.
३. क्र. सीसीआर १४९९/प्र.क्र. १३५/२-स, दि. २६.४.१९९९०
४. सीसीआर १४८२/२५४९/प्र.क्र. १४/२-स, दि. २५.५.१९८२.

**प्रस्तावना :-**

डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेंतर्गत रु. २५,००० पेक्षा कमी अल्पमुदत पीक कर्ज घेणा-या शेतकरी सभासदांनी कर्जाची विहित मुदतीत परतफेड केल्यास प्रोत्साहनात्मक सूट म्हणून मिळालेल्या कर्ज मुद्दलाची ४% रक्कम शेतक-यांच्या वतीने शासन भरते. या योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या सभासदांना वेगळी तरतूद करण्यात आली नसल्यामुळे त्यांना मुद्दलाच्या ८% रक्कम अनुदान स्वरुपात देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

विशेष घटक योजनेंतर्गत सध्या प्राथमिक सहकारी कृषि पतपुरवठा संस्थेतील अनुसूचित जाती व नवबौध्द सदस्यांना व्याज अनुदान देण्याची योजना अंमलात आहे. ज्यांचे बिगर शेती उत्पन्न प्रतिवर्षी रु. २४०० पेक्षा कमी आहे व ज्यांची पीक कर्ज मर्यादा रु. ७५० पेक्षा जास्त नाही अशा सभासदांनी अल्पमुदत पीक कर्ज, मुदतीत परतफेड केल्यास कर्जवरील व्याजात ३% अनुदान शासनामार्फत देण्यात येते. त्यामुळे संपूर्ण राज्यातून केवळ ७०० ते १४०० शेतकरी लाभार्थी आहेत. राज्यातील फारच कमी शेतक-यांना या योजनेचा लाभ होत होता. त्यामुळे सदर

योजना बंद करण्याचा निर्णय शासनाने या शासन निर्णयान्वये घेतला आहे. तसेच सध्या राज्यात डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनांतर्गत रु. २५,००० पेक्षा कमी अल्पमुदत पीक कर्ज घेणा-या शेतकरी सभासदांनी कर्जाची विहित मुदतीत परतफेड केल्यास प्रोत्साहनात्मक सूट म्हणून मिळालेल्या कर्ज मुद्दलाची ४% रक्कम शेतक-यांच्यावतीने शासन भरते. ही सर्वसाधारण योजना आहे. या योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या शेतकरी सभासदांना वेगळी अशी तरतूद करण्यात आलेली नाही. त्यामुळे अनुसूचित जातीच्या शेतकरी सभासदांना विशेष लाभ देण्याच्या अनुषंगाने डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेंतर्गत या सभासदांना त्यांच्या मुद्दलाच्या ८% रक्कम अनुदान स्वरुपात प्रोत्साहनात्मक सूट देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. यासाठी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत सर्वसाधारण योजनेतून ४% व सामाजिक न्याय विभागाच्या विशेष घटक योजनेंतर्गत जी ४% सवलत देण्यात येते ती, अशी एकूण ८% सवलत देण्यात येत आहे. या योजनेच्या अटी व शर्ती संदर्भ क्र. २ मध्ये नमूद केल्यानुसारच राहतील. ही योजना १ एप्रिल, २००३ पासून लागू करण्यात यावी. या योजनेसाठी कोणताही अतिरिक्त नियतव्यय उपलब्ध करुन दिला जाणार नसून यासाठी होणारा खर्च उपलब्ध तरतुदीतूनच भागविण्यात यावा.

या योजनेस सामाजिक न्याय विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. प्र.क्र.१५७२/व्यय-२, दि.११/१०/२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( य. दा. खवले )
सह सचिव, महाराष्ट्र शासन,
सहकार व वस्त्रोद्योग विभाग.

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाही अग्रेषित :-

१.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२.सर्व विभागीय आयुक्त,
३. सर्व जिल्हाधिकारी,
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,

५. मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडिया, ॲग्रीकल्चर क्रेडिट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई -१८.

६. उप मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडिया, ॲग्रीकल्चर क्रेडिट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई -१८.

७. सह सचिव, भारत सरकार, कृषि मंत्रालय (सहकार विभाग), कृषि भवन, नवी दिल्ली.

८. सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या, मुंबई.

९. व्यवस्थापक, सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका,

१०. सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था,

११. सर्व जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था,

१२. सर्व सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था,

१३. मुख्य संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.

१४. कार्यासन अधिकारी, ग्राम विकास विभाग, कार्यासन-२२,

१५. नियोजन विभाग, मंत्रालय,

१६. वित्त विभाग, व्यय-२/बीयुडी -१२, मंत्रालय,

१७. कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,

१८. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

२०. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व).

२१. मा. मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,

२२. निवड नस्ती, २-स, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.